**महाराष्ट्र फुटबॉल मिशन १ मिलियन अंमलबजावणी-फुटबॉल खरेदी प्रक्रीयेस मान्यता मिळणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : फिफामी-२०१७/प्र.क्र.१००/क्रीयुसे-१**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई ०३२ ४००
तारीख : ४ सप्टेंबर, २०१७.

वाचा :- १) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र.राक्रीधो-२०१२/प्र.क्र.२६०/ क्रीयुसे-१, दिनांक ०१ मार्च, २०१४.
२) शासन निर्णय उद्योग उर्जा व कामगार विभाग क्र.भांखस -२०१४/प्र.क्र.८२/ भाग-३/ उद्योग-४, दि. १ डिसेंबर, २०१६
३) शासन पत्र शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र.फिफामी २०१७/प्र.क्र. १००/ क्रीयुसे-१, दि. १२ जुलै, २०१७
४) शासन निर्णय वि.वि.क्र.जीएसटी-१०१७/प्र.क्र.८१-कराधान-१, दि.१९ ,ऑगस्ट,२०१७
५) सहसंचालक, क्रीडा व युवकसेवा, पुणे यांचे पत्र क्र.क्रीयुसे/ आफिफाक्रीस्पआ/ १७-१८/ का-४/४२२०, दि. २२ ऑगस्ट, २०१७
६) प्रभारी आयुक्त, क्रीडा व युवकसेवा, पुणे यांचे पत्र क्र. क्रीयुसे/ आफिफाक्रीस्पआ/ १७-१८/ का-४, दि. ३० ऑगस्ट, २०१७

प्रस्तावना :-

भारतात १७ वर्षाखालील फिफा वर्ल्डकप स्पर्धेचे आयोजन दि. ६ ते २८ ऑक्टोबर २०१७ या कालावधीत होणार असून या निमीत्ताने राज्य शासनाने दि.०७ जुलै २०१७ च्या शासन निर्णयाद्वारे महाराष्ट्र मिशन १ मिलियन हा कार्यक्रम जाहिर केला. सदर शासन निर्णयानुसार प्रत्येक जिल्हयात या योजनेचा प्रसार व्हावा म्हणुन ३३००० शाळामध्ये प्रत्येकी ३ याप्रमाणे अंदाजे १ लाख फुटबॉलचे वाटप करावयाचे आहे. त्यानुसार वाटप करावयाच्या फुटबॉलची खरेदी, ई निविदा प्रक्रीयेद्वारा करण्यासाठी शासनाने दि.१२ जुलै २०१७ च्या पत्रानुसार मान्यता दिलेली होती. तसेच सदर मान्यता पत्रामध्ये राज्यस्तरीय खरेदी समितीस सहाय्य करणेसाठी सहसंचालक क्रीडा व युवक सेवा यांचे अध्यक्षतेखाली तांत्रीक समिती स्थापन केलेली आहे. दि ०९.०८.२०१७.च्या शासनपत्रानुसार सुधारित मान्यता दिल्यानुसार क्रीडा व युवक सेवा संचालनालयाद्वारा दि १०.०८.२०१७.रोजी रु.४.९० एवढया किमतीचे फुटबॉल खरेदी करण्याबाबतची निविदा राज्य व राष्ट्रीय स्तरावर प्रसिध्द करण्यात आलेली आहे.

सदर निविदा प्रक्रीया व शासनाच्या दिनांक १२ जुलै, २०१७ च्या पत्रामधील सूचनांनुसार उद्योग, उर्जा व कामगार विभागाच्या दि. १ डिसेंबर, २०१६ मधील शासन निर्णयांनुसार ई निविदा मागविण्यात आली सदर ई निविदा तांत्रिक समितीने तांत्रिकदृष्टया तपासून त्यांनी पात्र ठरविलेल्या निविदा धारकांकडून वित्तीय निविदा उघडल्यानंतर पात्र ठरलेल्या पुरवठादारांना मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र फुटबॉल मिशन १ मिलियन या कार्यक्रमाच्या राज्यातील अंमलबजावणीकरीता नमुद पात्र पुरवठादारामधून विभागून फुटबॉल खरेदी खालील उल्लेखित दराने करण्यास व त्याचा पुरवठा करण्यास या शासन निर्णयाद्वारे प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | पुरवठादाराचे नाव | प्रतिनग फुटबॉल दर रु. | मंजूर रक्कम रु. कोटी |
|---|---|---|---|
| १ | मे.सुमीत स्पोर्टस अँड फिटनेस इक्वीपमेंट पुणे. | ६५०/- | २.४५ |
| २ | मे. कॉस्को इंडीया लिमिटेड दिल्ली | ६५०/- | २.४५ |

२. सदर फुटबॉल खरेदीवर होणारा एकूण रु.४.९० कोटी (रुपये चार कोटी नव्वद लक्ष फक्त) खर्च क्रीडा सुविधा निर्मितीसाठी आर्थिक सहाय्य या योजनेखाली क्रीडा साहित्यासाठी आर्थिक सहाय्य अंतर्गत मुख्यलेखाशीर्ष मागणी क्र.ई-३ लेखाशिर्ष २२०४ क्रीडा व युवक सेवा १०४ क्रीडा व खेळ (४०) क्रीडा सुविधा (४०) (०१) क्रीडा सुविधा निर्मितीसाठी सहाय्य करणे (२२०४ ५७०६) योजनांतर्गत या लेखा शिर्षामधून सन २०१७-१८ या वित्तीय वर्षाकरिता केलेल्या तरतूदीमधून खर्ची टाकण्यास शासन मान्यता देत आहे.

३. उपरोक्त योजने अंतर्गत राज्यातील खेळाडूंनी राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय स्तरावर दर्जेदार कामगिरी करण्यासाठी क्रीडा विषयक तंत्रशुध्द प्रशिक्षण व खेळाच्या दर्जात सुधारणा हे उद्दीष्ट गाठण्यासाठी व फुटबॉल खेळाची आवड निर्माण करणे व मुलांनी जास्तीत जास्त मैदानी खेळाकडे प्रवृत्त व्हावे यासाठी फुटबॉल पुरविण्यात येत असून या कार्यक्रमाची अंमलबजावणी दिनांक ०१ सप्टेंबर, २०१७ च्या परित्रकानुसार करण्याची दक्षता घेण्यात यावी. सदर कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसाठी दिनांक ०१ मार्च, २०१४ च्या शासन निर्णयातील (४) (अ) (१) व ४ (ब) (२) (३) (५) व (६) या अटी एकवेळची बाब म्हणून शिथील करण्यास शासन मान्यता देत आहे.

४. सदर फुटबॉलचे वाटप यु-डायस मधील संख्या विचारात घेऊन व ज्या शाळांनी संगणकावर उपलब्ध लिंकवर मागणी नोंदविली आहे त्या शाळांना प्राधान्याने करावे. सदर फुटबॉलचा पुरवठा दि. १५ सप्टेंबर, २०१७ रोजी जो फुटबॉल महोत्सव होणार आहे त्यापूर्वी सरावाकरिता उपलब्ध होतील याची दक्षता घेण्यात यावी.

५. पुरवठादाराने प्रत्येक जिल्हयाला फुटबॉलचा एक सिलबंद नमुना पुरविणे आवश्यक राहील. खरेदी पध्दती पूर्णपणे पारदर्शक व गुणवत्तापूर्ण राहण्यासाठी फुटबॉल पुरवठा झाल्यानंतर कोणताही १ फुटबॉल नमुना म्हणून निवडुन (Random Sample) तो तपासून त्याचा तपासणी अहवाल प्राप्त झाल्यानंतरच व नमुने योग्य असल्याची खात्री आयुक्त, क्रीडा व युवक सेवा यांनी करुन नंतरच पुरवठादारांना रक्कमा अदा करण्याची दक्षता घेण्यात यावी.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग- पहिला उपविभाग - ३, अनुक्रमांक ४, परिच्छेद क्रमांक २७ (२) अन्वये प्रशासकीय विभागाला प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०९०४१७१४०१६३२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Rajendra Shankarrao Pawar

Digitally signed by Rajendra Shankarrao Pawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education And Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=679184b88f7019ef64ad6ddc2495ca280267c0d4755ce63fa70c45cf755d9373, cn=Rajendra Shankarrao Pawar
Date: 2017.09.04 17:03:47 +05'30'

**( राजेंद्र पवार )**
**उपसचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.मंत्री (शालेय शिक्षण व क्रीडा) यांचे खाजगी सचिव.
२) मा.प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग,मंत्रालय,मुंबई.
३) आयुक्त,क्रीडा व युवक सेवा,महाराष्ट्र राज्य,पुणे.
४) महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
५) महालेखापाल लेखा व परिक्षा, महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
६) वित्त विभाग (व्यय-५),मंत्रालय,मुंबई.
७) नियोजन विभाग,का-१४७१,मंत्रालय,मुंबई.
८) वरिष्ठ कोषागार अधिकारी,पुणे.
९) निवड नस्ती, क्रीयुसे-१.